**नक्षलग्रस्त गडचिरोली व गोंदिया जिल्हयासाठी विशेष उपाययोजना करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्र.मबाआ-२०१०/प्र.क्र. २४१ /का-७
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -०३ सप्टेंबर, २०११.

**वाचा :-** १) उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन यांचे पत्र क्र. एनएएक्स-१०१०/प्र.क्र. ४६०/ विशा-१ ब , दि.२६.१०.२०१०.
२) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे क्र मबावि/. एबावि/ का-७/ २०११ /१०६२, दि.११.३.२०११
३) शासन ज्ञापन क्र. मबावि-२०१०/प्र.क्र.२४१/भाग२ का-७, दि.६.५.२०११.
४) शासन ज्ञापन महिला वबाल विकास विभाग क्र. पूरक-२०११/प्र.क्र.७४/का-४, दि.१२.८.२०११.

**शासन निर्णय :-** नक्षलग्रस्त गडचिरोली व गोंदिया जिल्हयासाठी विशेष उपाययोजना करण्याबाबत दि.२६.१०.२०१०रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीच्या अनुषंगाने एकात्मिक बाल विकास सेवा योजनांतर्गत नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयात असलेल्या बाल विकास प्रकल्प कार्यालयाची स्वत:ची इमारती नसल्यामुळे सदर बाल विकास प्रकल्प कार्यालयांसाठी जेथे जमीन उपलब्ध आहे तेथे स्वतंत्र इमारत बांधण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती.

२. बाल विकास प्रकल्प कार्यालयाच्या इमारत बांधकामासाठी स्वतंत्र निधीची तरतूद नव्हती. त्यामुळे सन २०११-१२ या वर्षाचे पूरक विवरणपत्र विधानमंडळाच्या मान्यतेसाठी सादर केले होते. दि.३१.३.२०१२ रोजी संपणारे या वित्तीय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ठ करण्यासाठी पूरवणी विनियोजन विधेयकास राज्यपालांनी सहमती दिली असून ते महाराष्ट्र (पुरवणी) विनियोजन अधिनियम-२०११ (सन २०११ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २४ म्हणून महाराष्ट्र शासन राज्यपत्र असाधारण भाग-४ दि.५.८.२०११ मध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे.

३. या विनियोजन अधिनियमानुसार गडचिरोली जिल्हयातील ज्या बाल विकास प्रकल्प कार्यालयांसाठी इमारत बांधण्यासाठी जागा उपलब्ध आहे अशा बाल विकास प्रकल्प कार्यालय

आरमोरी, देसाई गंज, चार्मोशी, मुंजेरा, धाणोरा व गडचिरोली अशा सहा बाल विकास प्रकल्प कार्यालयासाठी इमारत बांधण्याच्या अनुषंगाने प्रत्येकी रु.५७,९१,२०१/-(अक्षरी सत्तावन्न लाख एक्यान्नव हजार दोनशे एक) या प्रमाणे रक्कम रु.३,४७,४७,०००/- (अक्षरी तीन कोटी सत्तेचाळीस लाख सत्तेचाळीस हजार) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

४. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**मागणी क्रमांक एक्स-३**
**४२३६-पोषण आहार यावरील भांडवली खर्च.**
**८०- सर्वसाधारण**
**८००-इतर खर्च**
**(००) (०२) नक्षलग्रस्त जिल्हयातील एकात्मिक बाल विकास सेवा योजना प्रकल्प कार्यालय इमारत बांधकाम (४२३६ ०० २२)**
**५३ मोठी बांधकामे**

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३६/ अर्थसंकल्प -७, दि.१२.७.२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या website वर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०११०९०५१०१९५७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

**(शं. शा.पढाळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**
महालेखापाल महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर.
महालेखाकार (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा) प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे.
वित्त विभाग, अर्थसंकल्प-७, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, का-१४७२ ,मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (का-४) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, का-७.